**स्वातंत्र्य सैनिक सन्मान पेन्शन मिळण्यासाठी अर्ज केल्यानंतर पेन्शन मंजूर होण्यापूर्वी अर्जदाराचा मृत्यु झाल्यास त्याच्या विधवा पत्नीस परस्पर पेन्शन मंजूर करण्याबाबत अवलंबिण्यात यावयाची कार्यपध्दती.**

**महाराष्ट्र शासन,**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**परिपत्रक क्रमांक:संकीर्ण-२०००/प्र.क्र.३३८/२०००/स्वासैक-१,**
**मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक:-** १४/2/2009

**परिपत्रक** :- स्वातंत्र्य सैनिक सन्मान पेन्शनसाठी अर्जदाराकडून अर्ज केल्यानंतर पेन्शन मंजूर होण्यापूर्वी अशा अर्जदाराचा जर मृत्यु झाला तर तदनंतर त्यास शासनाकडून पेन्शन मंजूर झाली तरी हे पेन्शन त्याच्या विधवा पत्नीस अनुज्ञेय करण्यासंबंधी नेमकी कोणती कार्यवाही अवलंबण्यात यावी याबाबत शासन स्तरावर सांगोपांग विचार करण्यात आला. त्याबाबत असे ठरविण्यात आले की, जर एखाद्या अर्जदाराचे पेन्शन मंजूर करण्यापूर्वी मृत्यु झाला तर त्याच्या विधवा पत्नीला या पेन्शनची परस्पर अदायगी होण्याच्या दृष्टीकोनातून तिने जिल्हाधिकारी कार्यालयात ती त्या संबंधीत स्वातंत्र्य सैनिकाची कायदेशीर वारस आहे हे सिध्द करण्यासाठी खालील कागदोपत्री पुरावे जिल्हाधिकारी यांचेकडे सादर करणे आवश्यक आहे.

१) सन्मान पेन्शनसाठी ग्राहय धरण्याबाबत मयत झालेल्या अर्जदाराच्या विधवा पत्नीचा अर्ज.

२) वारसा प्रमाणपत्र.

३) मयत पतीच्या मृत्युचा दाखला.

४) अर्जदाराची पत्नी असल्याबाबत कायदेशीर कागदोपत्री पुरावे- ग्रामपंचायतीचा दाखला किंवा शिधापत्रिकेची छाया प्रत.

२. संबंधीत जिल्हाधिकारी यांना वरील प्रमाणे सर्व कागदोपत्री पुरावे अर्जदाराच्या विधवा पत्नीने सादर करावेत. त्या सर्व कागदोपत्री पुराव्यांच्या आधारे पडताळणी करुन व योग्य ती चौकशी जिल्हाधिकारी कार्यालयाने करुन अर्जदाराची विधवा पत्नी ही त्या अर्जदाराची कायदेशीर वारस आहे याची खात्री करावी. मयत स्वातंत्र्य सैनिकाच्या विधवा पत्नीला अर्जदार म्हणून ग्राहय धरण्यात यावे. त्यामुळे सन्मान पेन्शन ही विधवा पत्नीच्या नांवे मंजूर करण्यात येईल व त्यानुसार त्यांना पेन्शनचे वाटप करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राज भवन, मलबार हिल, मुंबई,

मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई,
राज्यमंत्री, सामान्य प्रशासन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई,
सभापती, स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समिती, मंत्रालय,मुंबई,
सदस्य सचिव, स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समिती, मंत्रालय,मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, २ प्रती,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर, २ प्रती,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी,
निवड नस्ती.